**छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था (SARTHI) ही संस्था स्थापण्याच्या संदर्भात पूर्वतयारीसाठी गठीत मार्गदर्शन समितीकरिता मनुष्यबळ व इतर सोयीसुविधा उपलब्ध करुन देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग

## शासन निर्णय क्र. सी.बी.सी.१०/२०१७/प्र.क्र.२/मावक

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक : ०५ जुलै, २०१७.

<u>वाचा :</u> शासन निर्णय क्र.सी.बी.सी.-१०/२०१७/प्र.क्र.२/मावक, दि.३ जानेवारी, २०१७.

<u>प्रस्तावना:</u>

संदर्भाधीन शासन निर्णयान्वये मराठा, कुणबी व शेती व्यवसायातील बहुजन समाज यांच्या सामाजिक, आर्थिक, शैक्षणिक विकासावर प्रकर्षाने लक्ष देण्यासाठी तसेच त्यांचे प्रश्न जाणून घेणे, त्याचा सविस्तर अभ्यास करणे, त्यावर उपाययोजना सुचविणे, यासाठी छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास (Chhatrapati Shahu Maharaj Research, Training and Human Development Institute (SARTHI) ) स्थापना करण्याचे प्रस्तावित आहे. त्यानुषंगाने पूर्व तयारीकरिता शासनास मार्गदर्शन व शिफारस करण्याकरिता श्री.सदानंद मोरे (साहित्यिक), अध्यक्ष आणि श्री.डी.आर.परिहार, सेवानिवृत्त भारतीय वनसेवा अधिकारी तथा माजी महासंचालक, डॉ.बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था (बार्टी), सदस्य यांची मार्गदर्शन समिती गठीत करण्यात आली आहे.

सदर समितीचे कामकाज सुरु करण्याकरिता समितीची कार्यकक्षा, कार्यालयाकरिता जागा, मानधन तत्वावर मनुष्यबळ तसेच इतर सोयीसुविधा उपलब्ध करुन देणे, इत्यादी बाबतचा विषय शासनाच्या विचाराधीन होता. यासंदर्भात खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे:-

<u>शासन निर्णय</u> :

**अ) उपरोक्त गठीत समितीची कार्यकक्षा पुढीलप्रमाणे राहील:-**

१.छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था (SARTHI) या प्रस्तावित संस्थेचे स्वरूप, उद्दिष्ट व ध्येय निश्चित करणे.

२.प्रस्तावित संस्थेची संघटनात्मक संरचना (प्रमुख अधिकारी व कर्मचारी यांचा आकृतिबंध) निश्चित करणे.

३.प्रस्तावित संस्थेच्या स्थापनेच्या उद्दिष्टांनुसार कार्यपद्धती विहित करणे.

४. प्रस्तावित संस्थेचे मुख्यालय निश्चित करणे.

५.प्रस्तावित संस्थेच्या कार्यालयीन कार्यपद्धतीच्या सुसुत्रतेकरिता आवश्यक संबंधित बाबींचा परामर्श घेऊन शासनास शिफारस करणे.

६.प्रस्तावित संस्थेच्या स्थापनेकरिता पूर्व तयारीसाठी शासनास मार्गदर्शन करणे.

ब) सदर समितीस पुढीलप्रमाणे कार्यालय, मनुष्यबळ व इतर सोयी सुविधा उपलब्ध करून देण्यास मान्यता देण्यात येत आहे:-

१. छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास (Chhatrapati Shahu Maharaj Research, Training and Human Development Institute (SARTHI) स्थापन करण्याच्या पूर्वतयारीकरिता शासनास मार्गदर्शन व शिफारस करण्यासाठी गठीत समितीचे कार्यालय, पुणे येथे सुरु करण्यास मंजूरी देण्यात येत आहे. सारथीच्या समितीसाठी जागेविषयी स्वतंत्र आदेश निर्गमित करण्यात येतील.

२. परिशिष्ट अ भाग-१ नुसार बार्टी या संस्थेकडे बाह्ययंत्रणेव्दारे उपलब्ध असलेल्या मनुष्यबळाची सेवा समितीच्या कामकाजासाठी उपलब्ध करून देण्यात यावी व भाग-२ नुसार साहित्य घेण्यास मान्यता देण्यात यावी कार्यालयीन कामकाजासाठी सदस्य सचिव तात्काळ उपलब्ध करून द्यावा.

३. समितीचा कार्यकाल ३ महिने इतका राहील.

४. समिती अध्यक्ष श्री.सदानंद मोरे यांना रुपये १.२५ लाख प्रतिमाह ठोक मानधन, तसेच प्रवासासाठी अशासकीय सदस्यांना रु ८,९००/- व त्याहून अधिक ग्रेड वेतन असणा-या शासकीय कर्मचा-याच्या दराने प्रवास भत्ता व दैनिक भत्ता अनुज्ञेय असेल. समितीचे अध्यक्ष व सदस्य यांना पुणे येथील स्थानिक प्रवासासाठी वाहन सुविधा व दूरध्वनी, इंटरनेट इत्यादी रु.३० हजार प्रतिमाह खर्च अनुज्ञेय असेल.

५. समिती सदस्य श्री.डी.आर. परिहार यांनी स्वेच्छेने विना मानधन व विना वेतन काम करणार असल्याने मानधन अनुज्ञेय राहणार नाही . (मात्र मानधन वगळता वरील अ. क्र. ४ येथे नमूद सुविधा अनुज्ञेय राहतील.)

**क) मार्गदर्शन समितीच्या कामकाजासाठी वरील परिच्छेद ४ प्रमाणे येणाऱ्या पुढे नमूद खर्चाचे मंजुरी अधिकार महासंचालक, डॉ.बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांना असतील:-**

१. परिच्छेद ब प्रमाणे समितीचे अध्यक्ष श्री.सदानंद मोरे यांना मासिक मानधन प्रदान करणे अध्यक्ष व सदस्य यांना वाहतूक,दूरध्वनी भत्त्याची प्रतिपूर्ती करणे, तसेच परिशिष्ट अ मधील भाग-१ नुसार मनुष्यबळास मानधन प्रदान करणे आणि समितीच्या कार्यकाळात परिशिष्ट अ मधील भाग-२ मध्ये नमूद केलेले साहित्य खरेदी करण्यासाठी खर्च.

२. समितीच्या कामकाजाच्या अनुषंगाने आयोजित बैठक व परिसंवाद, कार्यशाळा इत्यादीसाठी खर्च, कार्यालयीन चहापाणी, पुस्तके, नियतकालिके, वर्तमानपत्रे इत्यादीसाठीचा खर्च.
३. श्री.सदानंद मोरे, अध्यक्ष आणि श्री.डी.आर.परिहार, समिती सदस्य यांना समितीच्या कामकाजानिमित्त पुणे जिल्ह्याबाहेर प्रवास करावयाचा असल्यास आवश्यकतेप्रमाणे वाहन भाडे, शासकीय विश्रामगृह / निवास त्यासाठीचा खर्च
४. समितीस नेमून दिलेले कामकाज पार पडण्यासाठी निश्चित उद्दिष्टांशी संबंधित असलेले कोणतेही विशिष्ट प्रकारचे काम करून घेण्यासाठी कुशल व्यक्तींची सेवा घेतल्यास त्यांना वाजवी मानधन ठोक रक्कम देण्यासाठीचा खर्च.

ड) महासंचालक, बार्टी, पुणे यांनी उपरोक्त नमूद सर्व खर्च बार्टी, पुणे या संस्थेकडे मराठा आरक्षणाकरिता उपलब्ध निधीतून भागवावा. बार्टी संस्थेने वरीलप्रमाणे समितीकरिता मराठा आरक्षणाकरिता उपलब्ध निधीमधून खरेदी केलेले सर्व साहित्य भविष्यात स्थापन होणाऱ्या "सारथी" संस्थेकडे वर्ग करण्यात यावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०७१२१६५१४९७२२२ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dinesh Ramchandra Dingle

Digitally signed by Dinesh Ramchandra Dingle
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice And Special Assistance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8612f2011cf8cde3b074d561cd711c17c6c3fd836467a8648a8d21dc84bc01be, cn=Dinesh Ramchandra Dingle
Date: 2017.07.12 16:49:02 +05'30'

(दि.रा.डिंगळे)
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव,
२) मा. मुख्यमंत्री यांचे सचिव,
३) मा. मंत्री (सामाजिक न्याय) यांचे खाजगी सचिव,
४) मा. राज्यमंत्री (सामाजिक न्याय ) यांचे खाजगी सचिव,
५) विरोधी पक्षनेते, विधानसभा, विधान भवन, मुंबई
६) विरोधी पक्षनेते, विधान परिषद, विधान भवन मुंबई
७) महालेखापाल, महाराष्ट्र , मुंबई/नागपूर
८) प्रधान सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय,मुंबई
९) प्रधान सचिव, विधी व न्याय विभाग, मंत्रालय,मुंबई
१०) सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग यांचे वरिष्ठ स्वीय सहायक
११) सर्व विभागीय आयुक्त (महसुल)
१२) महासंचालक, डॉ.बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था , पुणे.

# परिशिष्ट-अ

**सारथी संस्था स्थापन करण्याकरीता शासनास मार्गदर्शन व शिफारस करण्याकरीता गठीत करण्यात आलेल्या समितीच्या कामकाजाकरीता मनुष्यबळ व साहित्य**

**भाग-१ समितीकरीता आवश्यक मनुष्यबळः-**

| | | |
|---|---|---|
| १) | संशोधन अधिकारी | ०१ |
| २) | सांख्यिकी अधिकारी | ०१ |
| ३) | स्वीय सहाय्यक | ०१ |
| ४) | स्टेनो-टायपीस्ट | ०१ |
| ५) | डेटा एन्ट्री ऑपरेटर | ०१ |
| ६) | कार्यालयीन सहायक | ०१ |

महासंचालक बार्टी, पुणे यांनी उपरोक्त मनुष्यबळासाठीचे मानधन समितीच्या शिफरशीनुसार निश्चित करावे. तसेच समिती सदस्यांनी कोणत्याही विशिष्ट व्यक्तीची सेवा उपलब्ध करून देण्यासाठी सूचना केल्यास त्या व्यक्तीची सेवा समितीच्या शिफारशीनुसार पारिश्रमिक /मानधन तत्तावर महासंचालक, बार्टी यांना तातडीने उपलब्ध करून द्यावे व द्यावी.

**भाग-२ समितीकरीता आवश्यक साहित्यः-**

| | | |
|---|---|---|
| १) | लॅपटॉप | ०२ |
| २) | डेस्कटॉप | ०५ |
| ३) | प्रिंटर-कम-स्कॅनर | ०३ |
| ४) | M. F. D. | ०१ |
| ५) | दूरध्वनी ( EPBX) | ०२ |
| ६) | कार्यालयीन सहायक (इंटरनेट ब्रॉडबँड सुविधेसह) | ०१ |
| ७) | कार्यालयीन स्टेशनरी | आवश्यकतेनुसार |
| ८) | कॉम्प्युटर स्टेशनरी | आवश्यकतेनुसार |

( महासंचालक, डॉ.बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था, बार्टी यांनी समितीच्या कार्यालयाकरीता सर्व आवश्यक फर्निचर, पार्टीशन, केबिन, कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकम विभाग, पुणे यांच्यामार्फत ताबडतोब समितीला उपलब्ध करून द्यावे व त्यापोटी निधीचे भुगतान सार्वजनिक बांधकाम विभागाला करण्यात यावे.)

*************